<u>सरळसेवा भरती</u>

सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन निर्णय क्र. नियुक्ती २०१४/प्र.क्र.१२१/सेवा-३,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक:- ०३ फेब्रुवारी, २०१५

<u>वाचाः</u>- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. ३७४(२)२(२)/२०१३/१४-ब, दि. २९.३.२०१४.

<u>संदर्भः</u>- शासन निर्णय क्र. नियुक्ती २०१४/प्र.क्र.१२१/सेवा-३, दिनांक ११.९.२०१४, दिनांक २६.११.२०१४, दिनांक ०५.१२.२०१४ व दि.१९ .०१.२०१५

**शासन निर्णय :-**

सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) गट-ब (राजपत्रित) मधील रिक्त पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक २९.३.२०१४ च्या पत्रान्वये ७६ उमेदवारांची शासनाकडे शिफारस केली आहे. त्या शिफारसीनुसार संदर्भीय शासन निर्णयान्वये ३५, १३, १३ व १ उमेदवारांना नियुक्ती देण्यात आली आहे. उर्वरित उमेदवारांपैकी खाली दर्शविलेल्या ०५ उमेदवारांची, सार्वजनिक बांधकाम विभागात, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या मंडळांतर्गत कार्यालयात महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा, सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या गट-ब (राजपत्रित) पदावर, पे बँड रु.९३००-३४८००/- व ग्रेड वेतन रु.४४००/- या वेतन संरचनेत, ते हजर होतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात येत आहे. उर्वरित उमेदवारांच्या चारित्र्य पडताळणी, वैद्यकीय पात्रतेचा अहवाल तसेच खेळाडू प्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांची आवश्यक ती प्रमाणपत्र पडताळणी प्राप्त झाल्यानंतर त्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात येतील.

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | जात प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | मलोआ गुणवत्ता क्र. | विभाग संवर्गानुसार महसूली विभाग | नियुक्ती देण्यात येत असलेले परिमंडळ/ मंडळ कार्यालय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | स्वप्निल कासार | खुला | खुला | ३ | नागपूर | सा.बां.मंडळ, चंद्रपूर |
| २ | कोटे प्रशांत भिमाशंकर | भजक | भजक | २१ | पुणे | सा.बां. मंडळ, सोलापूर |
| ३ | पाकळ सुमेरसिंग मर्दानसिंग | विजाअ | अपंग | ३७ | औरंगाबाद | सा.बां. मंडळ, नांदेड |
| ४ | पाटील अमित किरण | खुला | खुला खेळाडू | ६१ | कोकण | सा.बां. मंडळ, रत्नागिरी |
| ५ | मोरस्कर शैलश दत्तात्रय | खुला | अपंग | ६६ | कोकण | सा.बां. मंडळ, रत्नागिरी |

२. वरील प्रमाणे करण्यात आलेली अभियंत्यांची नियुक्ती ही, या विभागातील सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर, दोन वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

i) उपरोक्त यादीतील व उर्वरित अभियंत्यांची आपआपसातील ज्येष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ता क्रमांकानुसार राहील.

ii) उपरोक्त नमूद उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदांवर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर आवश्यकता भासल्यास देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन ४ वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरविल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु,

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

iii) उपरोक्त नमूद उमेदवारांना नियमानुसार विभागीय परीक्षा आणि मराठी व हिंदी भाषा परीक्षा, जर ती व्यक्ती आधीच या परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल तर अथवा अशा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्याला/तिला सूट देण्यात आली नसेल तर, या संबंधी केलेल्या नियमानुसार परीक्षा उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

iv) उपरोक्त नियुक्त केलेल्या उमेदवारांनी शासनाने वेळोवेळी विहित केलेली संगणक हाताळणी/ वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील. जी व्यक्ती सदर परीक्षा अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल तिला शासनाने विहित केलेली संगणक परीक्षा या संबंधी असलेल्या नियमानुसार विहित कालावधीत उत्तीर्ण करावी लागेल.

v) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अनियो-१००५/१२६/सेवा४, दि.३१.१०.२००५ मधील तरतुदीनुसार, दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर अधिकारी/ कर्मचारी यांची शासन सेवेत नियुक्ती होताच त्यांना नवीन 'परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना' लागू राहील. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्तीवेतन योजना (म्हणजे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४) आणि सध्या अस्तित्वात

असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहणार नाही. मात्र, उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक- अनियो-१००६/८७/सेवा-४, दि. १२ जानेवारी, २००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.

vi) नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांना विहित कालमर्यादेत हजर होणे शक्य नसल्यास तशी शासनाकडे आगावू परवानगी घेणे आवश्यक राहील. तशी परवानगी न घेतल्यास किंवा शासनाकडून त्यांना मुदतवाढ न मिळाल्यास त्यांना रुजू करुन घेतले जाणार नाही. तसेच आयोगाच्या गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही. जे उमेदवार या शासन निर्णयाच्या तारखेपासून **३०** दिवसांच्या आत हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही तर ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल. या बाबतचा अहवाल संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनाला दिनांक **०९/०३/२०१५** पर्यंत सादर करावा. सेवेत दाखल झालेल्या उमेदवारांनी आपला हजर झाल्याचा अहवाल तात्काळ संबंधित अधिकारी तसेच संबंधित परिमंडळीय अधीक्षक अभियंता यांना व शासनास सादर करावा.

vii) सदर पदावर नियुक्त करण्यात आलेली व्यक्ती, सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार, महाराष्ट्र राज्यात कोणत्याही ठिकाणी बदली केली जाण्यास पात्र असेल.

viii) सदर उमेदवारांपैकी सध्या शासन सेवेत जे कार्यरत आहेत त्यांच्या नियंत्रक अधिकाऱ्यांनी संबंधित उमेदवारांना नवीन ठिकाणी रुजू होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच जे उमेदवार निमशासकीय सेवेत/ महामंडळात कार्यरत आहेत त्यांनी, त्यांच्या कार्यालयाचे **ना हरकत प्रमाणपत्र तसेच त्यांच्या विरुद्ध विभागीय चौकशी/ शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरु नसल्याबाबतचे प्रमाणपत्र** नियुक्तीच्या वेळी सादर करावे.

ix) उपरोक्त उमेदवारांना नियुक्तीनंतर शासन सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास त्यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/आठ, दिनांक ०२.१२.१९९७ मधील तरतुदीनुसार शासनाला किमान एक महिन्याची पूर्वसूचना देणे आवश्यक राहील किंवा पूर्वसूचनेऐवजी त्यांचेकडून एक महिन्याचे वेतन वसूल करण्यात येईल. मात्र गैरशिस्त, सेवा नियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

x) उपरोक्त उमेदवार दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीवर राहतील. हा परिविक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त एक वर्षापर्यंत वाढविता येईल. जर त्याने/तिने विहित अथवा वाढीव कालावधीत परिविक्षाधीन कालावधी यशस्वी रित्या पूर्ण केला नाही किंवा विहित विभागीय परीक्षा व परिच्छेद २ (iii) व (iv) मधील परीक्षा उत्तीर्ण केली नाही अथवा त्या पदावर काम करण्यास योग्य नसल्याचे आढळून आल्यास ती व्यक्ती सेवा समाप्तीस पात्र राहील.

xi) उपरोक्त उमेदवारांना त्यांचे पदवीचे प्रमाणपत्र तपासणीच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात येत आहे. सदर पदवीचे प्रमाणपत्र अवैध ठरल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

३. उपरोक्त नमूद नियुक्ती देण्यात आलेल्या एकूण ०५ उमेदवारांनी सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावर रूजू होण्यासाठी त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या प्रादेशिक विभागाच्या अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ यांच्याशी तात्काळ संपर्क साधावा व संबंधीत परिमंडळीय अधीक्षक अभियंता यांनी उमेदवारांचे कागदपत्र तपासून त्यांना सविस्तर नियुक्तीचे आदेश तात्काळ काढावेत. उमेदवारांचे निवासी पत्ते सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०४१४४९४०८७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Fulchand Sakharam Meshram

Digitally signed by Fulchand Sakharam Meshram
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Fulchand Sakharam Meshram
Date: 2015.02.04 14:59:29 +05'30'

**( फु. स. मेश्राम )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर

५) अधीक्षक अभियंते, सा.बां. मंडळ

६) मा. मंत्री (सां.बा.) यांचे स्वीय सहाय्यक,

७) महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र मुंबई/नागपूर

८) महालेखापाल १/२, लेखापरिक्षा, महाराष्ट्र मुंबई/नागपूर

९) सह सचिव (संनि), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) उप सचिव (सेवा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) कार्यासन, आस्थापना-१/३, सेवा-१/२/६, प्रशा-१/२ सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) संबंधित उमेदवार,

(सोबत जोडलेल्या उमेदवारांच्या निवासी पत्त्यांच्या यादीनुसार-**नोंदणी पोच देय डाकेने**)

| **अ.क्र** | **सहाय्यक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-२ गट-ब पदावर नियुक्त उमेदवारांचे नांव व पत्ता** |
|---|---|
| १ | स्वप्निल कासार, एलआयजी-४३, हौसींग बोर्ड कॉलनी, बैतूलगंज, जि. बैतूल (मप्र) ४६०००१ |
| २ | कोटे प्रशांत भिमाशंकर, सव्हे नं ४५ विठ्ठल नगर, काळुबाई मंदीर जवळ, रत्नदिप चौक, वारजे माळवाडी ता. हवेली, जि. पुणे ४११०५८ |
| ३ | पाकळ सुमेरसिंग मदनसिंग, इ- २०१,तुलसी आर्केड, कॅनॉट पॅलेस, टाऊन सेंटर ,सिडको, पो.ता.जि.औरंगाबाद ४३१००३ |
| ४ | पाटील अमित किरण, मु.पो.कसबा तारळे, ता. राधानगरी, जि. कोल्हापूर ४१६२११ |
| ५ | मोरस्कर शैलश दत्तात्रय, मु.पो. राधानगरी गावठाण, जि. कोल्हापूर ४१६२१२ |

त्यांनी नियुक्ती दिलेल्या खालील संबंधित परिमंडळीय अधीक्षक अभियंता यांच्या कार्यालयात हजर होणेकरीता संपर्क साधावा.

| अ.क्र. | महसूली विभाग | कार्यालय व पत्ता | फोन नंबर |
|---|---|---|---|
| १ | कोकण | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, बांधकाम भवन, मर्झबन पथ, मुंबई | ०२२-२२०७८८६३ |
| २ | पुणे | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, मध्यवर्ती इमारत, स्टेशन रोड, पुणे-१ | ०२०-२६१२४२७८ |
| ३ | औरंगाबाद | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, अदालत रोड, जूने हायकोर्ट बिल्डींगच्या पाठीमागे, औरंगाबाद | ०२४०-२३३१०२२ |
| ४ | नागपूर | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, जूने सचिवालय इमारत, सिव्हिल लाईन्स, नागपूर | ०७१२-२५६०४०९ |

निवड नस्ती.